# जैतापूर अणुऊर्जा प्रकल्प हा शाप की ~~वरदान~~

## महाराष्ट्राचे प्रेरणास्थान श्री शिवराय



**शिवाजी महाराजांनी स्वराज्यात जंगल तोडण्यास बंदी घातली.**
**जंगलानी भूजलाची पातळी उंचावली, नद्या, तळी, विहिरी तुडुंब भरली.**
**पाणी जिवन फुलवते. म्हणून शेतकरी, रयत सुखी झाली.**
**यासाठी महाराजांनी प्रचंड धरणे बांधली नाहीत.**

### छत्रपती श्री शिवाजी महाराजांचे
### ।। आज्ञापत्र ।।
### पर्यावरणाबद्दल आस्था

आरमारास तक्ते, सोंट, डोलाच्या काठ्या आदि करून थोर लांकडे असावीं लागतात, आपले राज्यांत अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत त्यांचे जें अनुकूल पडेल तें हुजुरचे परवानगीने तोडून न्यावें. याविरहित जे लागेल तें परमुलखींहून खरेंदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे, फणस आदिकरून हेंहीं लांकडें आरामाराच्या प्रयोजनाचीं, परंतु त्यांस हात लावूं देऊ नये. काय म्हणोन, कीं, ही झाडे वर्षा दोन वर्षांनी होतात असें नाही. रयतांनी हीं झाडें लावून लेकरांसारखी बहुत काळ जतन करून वाढविलीं. ती झाडें तोडिल्यावर त्यांचे दु:खास पारावार काय? एकास दु:ख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारासहित स्वल्पकाळाचें बुडोन नाहिंसेच होतें; किंबहुना धनियाचे पदरीं प्रजा पीडण्याचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावें हानिही होते. याकरितां हे गोष्टी सर्वथैव होऊं न द्यावी. कदाचित् एखादें जें झाड बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असलें तरी त्याचे धन्यास राजी करून घेऊन द्रव्य देऊन त्याचे संतोषें तोडून न्यावें, बलात्कार सर्वथैव न करावा.

### महाराजांचे द्रष्टेपण - भावी गुलामगिरीची पावले ओळखली.
### ।। आज्ञापत्र ।।
### परदेशी व्यापाऱ्यांबाबतचें धोरण

साहुकारांमध्ये फिरंगी व इंग्रज व वलंदे व फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात. परंतु ते वरकड सावकरांसारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्यच करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्सातें हे लोक या प्रांती साहुकारीस येतात. राज्य कारणारास स्थळलोभ नाही असे काय घडों पाहतें? तथापि टोपीकरांस, या प्रांती प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं, हा पूर्णाभिमान. तदनुरुप स्थळोस्थळी कृतकार्यही झाले आहेत. त्यास ही हट्टी जात, हातास आलें स्थळ मेल्यानेंही सोडावयाचे नव्हेत. **यांची अमदरफ्ती आले गेले इतकीच असों द्यावी. त्यांस केवळ नेहमीं जागा देऊ नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचे येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित् वखारीस जागा देणें झाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरी न द्यावी.** तसे ठिकाणी जागा दिल्यानें जोपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तो आहेत, नाही ते समयीं आरमार, तोफा, दारूगोळा हेच त्यांचे बळ, आरमार पाठीशीं देऊन त्यांचे बळें त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार, तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें.

महाराजांनी युरोपियन व्यापाऱ्यांचा खरा हेतु ओळखला होता. दुर्देवाने आज जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पासारखे मानवजातीला धोका ठरणारे, पर्यावरणाचा नाश करणारे प्रकल्प, स्वत:च्या देशांत अणुभट्टया करण्यास तयार नसलेले देश भारतात करू पाहत आहेत. आपण, शिवरायांना मानत असू तर, कोणत्याही परिस्थितीत जैतापूर प्रकल्प होऊ देता कामा नये. यात राजकारणाचा संबंध आणू नये.

### जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पाला असलेल्या विरोधाची प्रमुख कारणे
### सरकारी अहवालांतील सत्य

दिल्लीतील माहिती आयुक्तांनी भाग पाडल्यामुळे अणुऊर्जा खात्याने महत्वपूर्ण अहवाल अर्जदार ग्रामस्थांना दिले. हे अहवाल जनसुनावणी होईपर्यंत व पर्यावरण मंजूरी दिली जाईपर्यंत जनतेला मिळाले नव्हते.

१) यातील १९७२ सालच्या मार्गदर्शक सूचना देणाऱ्या चक्रवर्ती समितीच्या अहवालानुसार भूभ्रंशापासून (fault) ५ कि. मी. च्या क्षेत्रात अणुभट्टी बांधता येणार नाही.

२) २००२ सालच्या चतुर्वेदी समितीच्या स्थान निश्चितीसंबंधी अहवालाप्रमाणे, खुद्द जेथे अणुभट्टया बांधल्या जाणार आहेत, त्या माडबनच्या सड्यातुनच भूभ्रंश (भूकवचातील भेग, तडा, फट) जातो. (भूकंपप्रवणता -मुद्दा क्र. १२:३) प्रकल्पाच्या स्थानापासून ५ कि. मी. अंतराच्या आत आणखी दोन भूभ्रंश आहेत. शिवाय, १०,१५,२४ व २५ कि. मी. अंतरावरून भूभ्रंश जात आहेत. नजिकच्या क्षेत्रात याशिवाय अनेक भूभ्रंश आहेत.
अणुऊर्जा नियामक मंडळाचा (AERB) सन २००१ चा अहवाल म्हणतो की भूकवचातल्या भेगेवर अणुभट्टी बांधू नये.

**याचा अर्थ जैतापूरचे स्थळ अणुभट्टी बांधण्यासाठी अयोग्य आहे. तेथे अणुभट्टी बांधता येणार नाही.**

**पठार (सडा ) तोडणार-त्सुनामीपासून संरक्षण नाही.**

३) चतुर्वेदी समितीच्या अहवालातील 'अणुभट्टयांच्या बांधकामाचा पाया घालणे' आणि त्या संबंधीचे 'भूरचनाशास्त्र' या प्रकारणात स्पष्ट केले आहे. की, 'सुमारे २० ते ३० मीटर उंचीचा माडबनचा सडा (पठार) जांभा दगडाने बनलेला आहे. भट्टयांचे वजनदार आणि जोखमीचे बांधकाम पेलण्याची ताकद या सड्यामध्ये नाही. म्हणून तो पूर्णपणे तोडून काढून टाकावा लागणार आहे. सागरपातळीच्याही खाली असलेला काळा कठीण बेसॉल्ट खडक लागेपर्यंतचे वरील पठार तोडावे लागले.''
याचा अर्थ कितीही उंचीच्या सुनामी लाटेपासून प्रकल्पाला धोका पोहचू शकतो. प्रकल्प करणारांकडून यापूर्वी दिली गेलेली माहिती आणि केलेला दावा दिशाभूल करणारा होता.

**विभाग भूकंपदृष्ट्या अत्यंत संवेदनशील**

४) प्रकल्पाचे स्थळ हे 'मध्यम- धोकादायक' स्वरूपाच्या ३ क्रमांकाच्या विभागात आहे. महत्वाचे म्हणजे ते 'अतिधोकादायक' अशा ४ क्रमांकाच्या क्षेत्रापासून अत्यंत निकट आहे. माडबनच्या डॉ. वाघधरेंनी पिच्छा पुरविल्यानंतर बरीच खळखळ करून एन. पी. सी. आय. एल. ने दिलेल्या माहितीप्रमाणे १९८५ ते २००५ या वीस वर्षाच्या कालावधीत प्रकल्पस्थळाला मध्यम व मोठ्या स्वरूपाचे ९३ धक्के बसले. यात ६.३ रिश्टर पातळीच्या धक्क्याचाही समावेश आहे. दरवर्षी सुमारे ५ ते ६मध्यम व मोठे धक्के बसतात. चिंतेची बाब म्हणजे गेल्या दहा-बारा वर्षांत प्रकल्प स्थळापासून सुमारे १५ कि.मी. च्या अंतरातील क्षेत्रात धोपेश्वर, शिवणे बु., देवाचे गोठणे, महांगुळे इ. गांवांनजीक डोंगर खचणे, जमीन फाटणे, प्रदीर्घ तडे जाणे, जमीन खाली-वर होणे, पाण्याचे प्रवाह बदलणे अशा गंभीर स्वरुपाच्या घटना वारंवार घडत आहेत. यापैकी शिवणे बुद्रुकचा एक तडा सलग सुमारे ३ किलोमीटर लांब आहे. काही ठिकाणी हा तडा सुमारे ५० फूट रुंद व ७० फूट खोल आहे. **अमेरिकेने भूभ्रंश आढळल्यामुळे कॅलिफोर्नियातील 'हम्बोल्ट बे' ही अणुभट्टी १९७६ सालात बंद केली.**

**सागरी जीवन उध्वस्त होणार**

५) भारतीय सागरविज्ञान संस्थेने १९८९ सालच्या अभ्यासात 'माडबन' येथे १००० मेगावॅट क्षमतेचा प्रकल्प आल्यास, त्यातून सोडलेल्या गरम पाण्यामुळे येथील उत्कृष्ट सागरी मत्स्य जीवनाचा नाश होईल असे बजावले. १०,००० मेगावॅट (१६५० × ६) क्षमतेच्या जैतापूर प्रकल्पासाठी रोज ५२०० कोटी लिटर पाणी (मुंबईच्या रोजच्या पाणीपुरवठ्याच्या १३ पट) सागरातून खेचून ६ ते १५ अंश सें. वा त्याहून जास्त वाढलेल्या तापमानासह सागरात सोडले जाईल. तारापूरच्या सागरातील मासे नष्ट झाले हे या संदर्भात लक्षात घ्यावे.

**पारदर्शकता नाही**

६) अतिनिषिद्ध क्षेत्र, प्रतिबंधित क्षेत्र, व्यवस्थापन क्षेत्र, भट्टीविलय (meltdown) स्वरूपाचा अपघात घडल्यास कायमचे निर्मनुष्य करण्याचे क्षेत्र, अशा अनेक बाबींत कोकणच्या तसेच महाराष्ट्रातील इतर जिल्ह्यातील माणसांना कोणतीही माहिती दिली गेलेली नाही.

रशियातील 'चेर्नोबिल' व जपान मधील 'फुकुशिमा' येथील अपघातांनंतर भट्टीपासून ३० कि.मी. त्रिज्येच्या वर्तुळातील क्षेत्र कायमचे निर्मनुष्य केले गेले. जैतापूरच्या १६५० मेगावॅट क्षमतेच्या अणूभट्ट्या पाहता सुमारे १०० कि.मी. त्रिज्येच्या वर्तुळातील क्षेत्र कायमचे निर्मनुष्य करावे लागेल. त्यात पूर्ण सिंधुदुर्ग तसेच रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर या जिल्हयांच्या मोठ्या क्षेत्राचा समावेश होईल.

**किरणोत्साराचे जीवनविरोधी स्वरूप**

७) जगभर डॉ. मॅनकुसो, डॉ. गॉफमन, डॉ. टॅपलिन (अमेरीका), डॉ. एडवर्ड गॉर्डन (कॅनडा), डॉ. ॲलिस स्टुअर्ट (इंग्लंड) अशा अनेक तज्ञांच्या सरकारी अहवालांनी किरणोत्सारामुळे कर्करोग (कॅन्सर), व्यंग, वंध्यत्व, मंतिमदत्व, अर्भकांचे मृत्यु, इंद्रिये निकामी होणे असे शेकडो वेदनादायी भीषण आजार व परिणाम होतात हे निर्विवादपणे सिद्ध केले आहे. अशा अहवालांनी स्पष्ट केले की, '**किरणोत्साराची कोणतीही किमान सुरक्षित पातळी नसते.**' शांततेने चालू असलेली अणुभट्टी देखील वातावरणात व पाण्यात किरणोत्सार सोडतच असते.' अमेरीका, जर्मनीसह युरोप, रशिया, जपान यांनी भट्ट्या बांधणे थांबवले. चालू अणुभट्टयादेखील ते बंद करत आहेत.

**किरणोत्सारावर उपाय नाही - अणुकचऱ्याची सुरक्षित विल्हेवाट अशक्य**

८) युरोपियन संसदेच्या 'जागतिक अणुउद्योगाचा स्थितीदर्शक अहवाल -२०१३' मध्ये नमूद केले आहे की, **चार लाख टन किरणोत्सारी पाणी 'फुकुशिमा' येथील अपघातस्थळावर साठवून ठेवले आहे. (ते आता दहा लाख टन झाले आहे.) त्याची प्रशांत महासागरात वरचेवर होत असलेली गळती ही जागतिक स्वरूपाची आपत्ती आहे.' अमेरिकेचे अध्यक्ष बराक ओबामा यांनी 'नेवाडा' प्रांतातील 'युक्का' पर्वतातील अणुकचऱ्याची दफनभूमी बनवण्याचा महत्वाकांक्षी प्रकल्प बरेच काम व प्रचंड खर्च झाला असूनही रद्द केला व काम बंद केले. फुकुशिमा दुर्घटनेत आजारी व बळी पडलेल्या हजारो अमेरिकन नौसैनिकांच्या न्यायासाठी कंपनीवर दावा ठोकण्यात आला आहे.**

**अणुऊर्जा स्वच्छ नाही. जागतिक तापमान वाढीच्या समस्येचे (ग्लोबल वॉर्मिंग) उत्तर नाही.**

९) युरोपियन संसदेच्या सन २००५ मधील डॉ. स्टॅार्म व डॉ. स्मिथ यांच्या सखोल अभ्यासात हे स्पष्ट झाले की, पूर्ण अणुइंधन चक्रात मोठ्या प्रमाणावर खनिज इंधने जाळली जातात. त्यामुळे मोठे कार्बन उत्सर्जन होते.

**अणुऊर्जा अनुत्पादक**

१०) महत्वाची गोष्ट म्हणजे इंग्लडच्या ऑक्सफर्ड संशोधन गटाच्या अहवालाप्रमाणे अणुऊर्जा ही अनुत्पादक (non-productive) आहे. अणुऊर्जेद्वारे वीज निर्माण करण्यासाठी युरेनियम इंधन चक्रात वापरली जाणरी वीज ही अणुभट्टीतून निर्माण होणाऱ्या वीजेइतकी किंवा त्याहून जास्त असते.

**अणुऊर्जा महागडी**

११) अणुऊर्जा स्वस्त असल्याचा तद्दन खोटा प्रचार अणुउद्योगाकडून केला जातो. परंतु अमेरीकेतील मॅसाच्युसेटस् तंत्रज्ञान संस्थेने (मॅसाच्युसेटस् इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी) केलेल्या अभ्यासात हे सिद्ध झाले की, अणुवीज इतर स्त्रोतांतून निर्माण होणाऱ्या वीजेपेक्षा तीन ते चार पट महाग आहे. जर जड पाणी व इतर अनेक गोष्टींसाठी दिली जाणारी अनुदाने लक्षात घेतली तर अणुवीज अनेक पटीने महाग आहे. **अणुऊर्जा हा पांढरा हत्ती आहे. हे नागरिकांच्या लक्षात येत नाही. कारण, ते वीजेची खरी किंमत बिलातून नव्हे तर, करातून भरत असतात.**

**अणुऊर्जेचा एकूण वीज निर्मितीतील वाटा नगण्य**

१२) जनतेचे अज्ञान आणि बधिरपण हे अणुउद्योगाचे खरे भांडवल आहे. गेली साठ वर्षे सरकारकडून लाडावले जाऊनही भारतात अणुवीजेचे एकूण वीज उत्पादनातील प्रमाण (स्थापित क्षमता) फक्त १.९% आहे. तर फक्त गेल्या सुमारे वीस वर्षात विशेष आर्थिक तरतूद नसताना, आबाळ केली जात असतानाही विकसित झालेल्या नुतनीकरणक्षम (अकार्बनी) ऊर्जास्त्रोतांचे वीजनिर्मितीतील योगदान (स्थापित क्षमता) २०% आहे.

**भारतीय पर्यावरण चळवळ - संपर्कः ॲड. गिरीश राऊत - ९८६९०२३१२७, २४३७८९४८**